**महाड, जिरायगड. येथील पूर सौमीकरण उपाययोजना म्हणून सावित्री नदीतील गाळ काढण्यासाठी आवश्यक खर्चास प्रशासकीय मान्यता देणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्रमांक: आव्यप्र-२०२२/प्र.क्र.३९८/आव्यप्र-१**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई.
दिनांक:- २९ मार्च २०२४

**वाचा:-** जिल्हाधिकारी यांचे पत्र क्र.साशा/कार्या-१/ब ५/आ.व्य/सावित्री नदी/इंधन व भाडेखर्च/२०२३, दि.२७.१२.२०२२.

**प्रस्तावना:-**

सन २०२२ मध्ये महाड जिल्हा रायगड येथील पूर नियंत्रणासाठी सावित्री नदीतील गाळ काढण्याकरिता रुपये ९.५५ कोटी एवढा निधी उपलब्ध करून दिला होता. सदर निधीतून झालेल्या कामामुळे पूरपातळीमध्ये लक्षणीय घट झाली असल्याचे जिल्हाधिकारी यांच्या अहवालात नमूद केले आहे. त्याअनुषंगाने महाड येथील पुरनियंत्रणासाठी महाड तालुक्यातील ५८ गावे व पोलादपूर तालुक्यातील १९ गावातील सावित्री नदीतील अंदाजित २४ लक्ष घनमीटर इतका गाळ काढण्यासाठी इंधन खर्च उपलब्ध करून देण्यासाठी रुपये ३१.११ कोटी निधीची मागणी जिल्हाधिकारी रायगड यांनी केली असून या मागणीनुसार राज्य कार्यकारी समितीने रु.३१.११ कोटीच्या प्रस्तावास दि. २४ जानेवारी, २०२३ रोजी या कामासाठी रुपये ३१.११ कोटी एवढ्या निधीस मान्यता दिली आहे. त्यानुसार सादर कामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

महाड शहरातील पूर नियंत्रणासाठी सावित्री नदीत जमा झालेला गाळ काढणे ही आपत्ती सौम्यीकरणाची बाब असल्याने सावित्री नदीमधील गाळ काढण्यासाठी मागील वर्षी गाळ काढल्याने लिलावाद्वारे जमा झालेल्या स्वामित्वधनाची (Royalty) माहिती सादर करणे, त्याचप्रमाणे यावर्षीही स्वामित्वधनाबाबत नियंत्रण करणे व आवश्यक त्या सर्व परवानग्या जिल्हाधिकारी यांनी घेणे अनिवार्य असून या अटीच्या अधिन राहून प्रस्तावित कामास रुपये **३१.११ कोटी** इतक्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२३६/२०२३/ व्यय ९, दिनांक १८/०७/२०२३ रोजी दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

या कामी होणारा खर्च मागणी सी-६, २२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ८० सर्वसाधारण (०१)(०१) महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाचे कार्यालय स्थापन करणे व फर्निचर व साधनसामुग्रीसह सुसज्जीकरण करणे (२२४५ १७६१) ३१-सहायक अनुदाने (सशर्त) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून करणायात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३३०१५४५५०३९१९ असा आहे.

महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नावाने,

HITENDRA YADAORAO DUFARE

Digitally signed by HITENDRA YADAORAO DUFARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=1170c73752038d1c4f8b3a8c1729f3f55bd8bd13206eed4aead71a63b3f1dcee, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=02BBA6FFE202C222698F7E91A562A124096291549EBA836EE89EC11CB9F688D5, cn=HITENDRA YADAORAO DUFARE
Date: 2024.03.30 15:55:39 +05'30'

**(हि.या.दुफारे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१) प्रधान सचिव, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.

२) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.

३) वित्तीय सल्लागार व सह सचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.

४) जिल्हाधिकारी, रायगड.

५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.

६) महालेखापाल (लेखापरिक्षा),मुंबई.

७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.

८) जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड.

९) निवड नस्ती/आव्यप्र-१.